**खांदेरी किल्ला, ता. अलिबाग, जि. रायगड राज्य संरक्षित स्मारक म्हणून घोषित करणेबाबत अंतिम अधिसूचना**

# महाराष्ट्र शासन

## पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग

**शासन निर्णय क्रमांक : रासंस्मा-२०१७/प्र.क्र.१०८/सां.का.३**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १९ जून, २०२४

**शासन निर्णय :-**

खांदेरी किल्ला, ता. अलिबाग, जि. रायगड हे राज्य संरक्षित स्मारक म्हणून घोषित करणेबाबत विहीत कार्यपध्दतीची प्रक्रिया पूर्ण झाली असल्याने व्यवस्थापक, शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, चर्नी रोड, मुंबई यांना या शासन निर्णयाव्दारे निदेश देण्यात येत आहेत की, या निर्णया सोबतची अंतिम अधिसूचना मराठी व इंग्रजी भाषेत महाराष्ट्र शासन सर्वसाधारण राजपत्र भाग-४ मध्ये प्रसिध्द करावी व सदर अधिसूचनेच्या ३० प्रती प्रधान सचिव, सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई व संचालक, पुरातत्व वस्तुसंग्रहालये संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना पाठविण्यात याव्यात.

०२. संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांनी सदरहू अंतिम अधिसूचनेची प्रत स्मारकाजवळ ठळक ठिकाणी लावण्याची व्यवस्था करावी.

०३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०६१९१७००१०६०२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्याचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NANDA MARUTI RAUT
Digitally signed by NANDA MARUTI RAUT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL DEPARTMENT,
2.5.4.20=281d8ee0076aee3a052a490903f93deadef9f7e2a186620ec03666d244838270,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=BAF9D9317025580944685E047B9C52D64C532684054F19E1F02C374B78E1773F, cn=NANDA MARUTI RAUT
Date: 2024.06.19 17:16:54 +05'30'

**( नंदा राऊत )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

व्यवस्थापक, शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, चर्नी रोड, मुंबई ४०० ००४.
संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, मुंबई.
सहायक संचालक, पुरातत्व विभाग, रत्नागिरी.
विभागीय आयुक्त, कोकण.
जिल्हाधिकारी, रायगड.
निवड नस्ती, सां.का.३

# अधिसूचना

पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग
मंत्रालय, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-३२.
दिनांक : १९ जून २०२४.

महाराष्ट्र प्राचीन स्मारके व पुराणवस्तुशास्त्रविषयक स्थळे व अवशेष अधिनियम, १९६० :

क्र. रासंस्मा-२०१७/प्र.क्र.१०८/सां.का.३.

ज्याअर्थी, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागाची शासकीय अधिसूचना क्र. रासंस्मा-२०१७/प्र.क्र.१०८/सां.का.३, दि.१८ डिसेंबर, २०१७ अन्वये महाराष्ट्र शासनाने महाराष्ट्र प्राचीन स्मारके व पुराणवस्तुशास्त्रविषयक स्थळे व अवशेष अधिनियम, १९६० (सन १९६१ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक १२) या अधिनियमाच्या कलम ४ च्या पोट-कलम (१) अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन यासोबत असलेल्या अनुसूचित निर्दिष्ट केलेले प्राचीन व ऐतिहासिक स्मारक संरक्षित स्मारक म्हणून घोषित करण्याचा शासनाचा इरादा असल्याची दोन महिन्यांची मुदत दिली होती;

आणि ज्याअर्थी, असे स्मारक संरक्षित म्हणून घोषित करण्यासंबंधी शासनाकडे कोणत्याही हरकती आलेल्या नाहीत.

त्याअर्थी, आता महाराष्ट्र प्राचीन स्मारके व पुराणवस्तुशास्त्रविषयक स्थळे व अवशेष अधिनियम, १९६० (सन १९६१ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक १२) या अधिनियमाच्या कलम ४ च्या पोट-कलम (३) अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन महाराष्ट्र शासन याद्वारे उक्त प्राचीन व ऐतिहासिक स्मारक हे संरक्षित स्मारक असल्याचे जाहीर करत आहे.

# अनुसूची

स्थान : खांदेरी　　　तालुका : अलिबाग　　　जिल्हा : रायगड.
सर्व्हे/गट क्र.:- १ व २

| | | |
|---|---|---|
| स्मारकाचे नांव | : | खांदेरी किल्ला |
| मालकी | : | सरकारी. |
| तपशील | : | इ.स १६७२ पर्यंत खांदेरी हे बेट निर्जन व दुर्लक्षित होते. इ.स. १६७२ मध्ये शिवाजी महाराजांनी हे बेट ताब्यात घेवून त्यावर तटबंदी बांधण्यास सुरुवात केली. तथापि त्यास प्रचंड विरोध झाल्यामुळे आणि इतर अडचणीमुळे महाराजांना त्यावेळी तो प्रयत्न सोडून द्यावा लागला. पुढे इ.स. १६७९-१६८० या काळात ब्रिटीश, मुघल, पोर्तुगीज आणि सिद्दी यांच्या विरोधावर आणि त्यांनी केलेल्या नाकेबंदीवर यशस्वी मात करुन महाराजांनी हा किल्ला बांधला. छत्रपती संभाजी महाराजांच्या काळात हा किल्ला मराठयांचा एक प्रमुख नाविकतळ होता. नंतर छत्रपती संभाजी महाराजांच्या हत्येनंतर उद्भवलेल्या कठीण काळातही मराठ्यांनी हा किल्ला राखला. १८ व्या शतकाच्या सुरुवातीला कान्होजी आंग्रे यांचा एक प्रबळ नाविक सत्ता म्हणून उदय झाला व त्यांनी कोकण किनाऱ्यावरील सागरी वाहतुकीस त्यांचे दस्तक घेणे बंधणकारक केले.१२-१४ नोव्हेंबर १७१९ या काळात ब्रिटीश आणि पोर्तुगीजांनी खांदेरीवर एकत्रित हल्ला केला. पण कान्होजींनी त्यांचा पराभव केला. इ.स.१८१८ मध्ये हा किल्ला ब्रिटीशांच्या ताब्यात गेला.<br>खांदेरी किल्ल्याची तटबंदी बऱ्यापैकी रूंद व बेटाच्या सर्व बाजूंनी असून त्याला दोन दरवाजे होते. त्यातील महाद्वार नष्ट झाले असले तरी पश्चिम तटबंदील चोर दरवाजा शाबूत आहे. तटबंदीत तीन कक्षही आहेत. किल्ल्याला एकूण एकवीस बुरूज असून किल्ल्यात एकूण चार विहीरी आणि वास्तुंच्या पायाचे अनेक अवशेष आहे. मराठयांच्या प्रारंभीच्या काळातील एक नाविक तळ म्हणून या किल्ल्याचे महत्व अनन्यसाधारण आहे. |

| | | |
|---|---|---|
| **संरक्षित करावयाच्या स्मारकाचे क्षेत्रफळ** | **:** | क्षेत्रफळ – ५ हेक्टर ९५ आर. |
| **संरक्षित करावयाचे एकूण क्षेत्रफळ (स्मारकासह)** | **:** | एकूण संरक्षित करावयाचे क्षेत्रफळ : ५ हेक्टर ९५ आर. |
| **संरक्षित करावयाच्या क्षेत्राच्या चतु:सिमा** | **:** | पूर्व : अरबी समुद्र;<br>पश्चिम : अरबी समुद्र;<br>उत्तर : अरबी समुद्र;<br>दक्षिण : अरबी समुद्र. |

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावांने,

NANDA MARUTI RAUT

Digitally signed by NANDA MARUTI RAUT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL DEPARTMENT,
2.5.4.20=281d8ee0076aee3a052a490903f93deadef9f7e2a186620ec03666d244838270,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=BAF9D9317025580944685E047B9C52D64C532684054F19E1F02C374B78E1773F,
cn=NANDA MARUTI RAUT
Date: 2024.06.19 17:17:12 +05'30'

(नंदा राऊत)
उप सचिव , महाराष्ट्र शासन

# NOTIFICATION

Tourism and Cultural Affairs Department
Mantralaya, Madam Cama Marg,
Hutatma Rajguru Chowk,
Mumbai – 400 032.
Dated: 19 June 2024

Maharashtra Ancient Monuments and Archaeological Sites and Remains Act, 1960 : No. Rasasma 2017 / C.R.108 / Sanka 3, - Whereas, by the Government Notification, No. Rasasma 2017 / C.R.108 / Sanka 3, Dated 18th December, 2017, the Government of Maharashtra had given two months' notice of its intention to declare the ancient and historical monument specified in the schedule appended hereto to be a Protected Monument, as required by sub-section *(1)* of section 4 of Maharashtra Ancient Monuments and Archaeological Sites and Remains Act, 1960 (Mah. XII of 1961);

And Whereas the Government has not received any objection to the making of such declaration;

Now, therefore, in exercise of powers conferred by Sub-Section *(3)* of Section 4 of the Maharashtra Ancient Monuments and Archaeological Sites and Remains Act, 1960 (Mah. XII of 1961); the Government of Maharashtra hereby declares the said ancient and historical monument to be a Protected Monument.

# SCHEDULE

**Locality: Khanderi, Taluka : Alibaug, District: Raigad.**
**Survey/Gat No. 1 and 2.**

| | | |
|---|---|---|
| **Name of the monument to be protected** | **:** | Khanderi Fort**.** |
| **Ownership** | **:** | Government. |
| **Particulars** | **:** | The Island of Khanderi was unused and uninhabited till 1672 A. D., when Shivaji Maharaj attempted to fortify it. But due to strong opposition and other problems, he has to give up that effort for time being. But later during 1679-1680 A.D. he sucessfully fortified the said island despite strong resistance of British, Mughals, Portuguese and Siddi and the hindrances created by them. In the region of Chhatrapati Sambhaji Maharaj, this fort stood as one of the strong naval bases of Swarajya. Being of 18th Century witnessed the rise of Kanhoji Angre as a strong rising naval power of Marathas, who implemented license system for all the ships sailing on the konkan coast. In resistances to this, British and Portuguese together attacked Khanderi on 12- 14 November 1719 A. D. but were defeated by Kanhoji.<br>The fort has broad fortification wall, made in dry masonry, running all around the island, having three cells in it. The fort has two doors, but only one minor door is still intact. The fort has in all twenty one bastions, four wells as well as remains of many plinth. This fort being one of the early naval establishments of Marathas, has extraordinary historical significance. |
| **Area of the Monument to be protected** | **:** | Area: 5 Hectors, 95 Are. |
| **Total Area (including the monuments ) to be protected** | : | Area: 5 Hectors, 95 Are. |
| **Boundaries** | **:** | East : Arabian Sea;<br>West : Arabian Sea;<br>North : Arabian Sea;<br>South : Arabian Sea. |

By order and in the name of the
Governor of Maharashtra

NANDA MARUTI RAUT

Digitally signed by NANDA MARUTI RAUT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL DEPARTMENT, 2.5.4.20=281d8ee0076aee3a052a490903f93deadef9f7e2a186620ec03666d244838270, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BAF9D9317025580944685E047B9C52D64C532684054F19E1F02C374B78E1773F, cn=NANDA MARUTI RAUT
Date: 2024.06.19 17:17:31 +05'30'

(Nanda Raut)
Deputy Secretary to Government